**महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (प्रशासन शाखा) या संवर्गातील शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती,**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नियुक्ती -२०१४/(२५९/१४)/मशि-१**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२
तारीख: ०५/०१/२०१५

वाचा :-

१) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्रमांकः २२२/१७०६१/सात,दि.२१ ऑक्टोबर, २०१४

**शासन निर्णयः-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत खालील उमेदवाराची शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट 'अ' (प्रशासन शाखा) या पदावर त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रकान्यात ते ज्या दिनांकापासून त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकृत करतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | वर्गवारी | शेरा | आयोगाने दिलेला गुणवत्ता क्रमांक | पदस्थापनेचा तपशिल |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. माने धनराज रघुराम | अराखीव | अराखीव पदासाठी | १ | उच्च शिक्षण संचालनालय, पुणे |

२. उपरोक्त उमेदवाराची शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ (प्रशासन शाखा) या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून नामनिर्देशनाने, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे:-

१) उपरोक्त उमेदवाराची वेतनश्रेणी रु. ३७४०० - ६७००० श्रेणी वेतन ८९०० अशी राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता,घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) उपरोक्त उमेदवारास प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) उपरोक्त उमेदवाराचे परिवीक्षा कालावधीतील काम किवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाचे अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यास अथवा सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

५) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.७/८/२०००अन्वये शासनसेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी /वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. उपरोक्त उमेदवाराने शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९/३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र **नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत** उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.जर त्यांनी विहीत मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील.

६) उपरोक्त उमेदवाराची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

७) उपरोक्त उमेदवाराचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम,१९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात येईल.

८) सदर उमेदवाराची नियुक्ती ही महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या मुळ अर्ज क्रमांक १३७/२०१४ व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे श्री.बी. बी. कदम यांनी दाखल केलेल्या सिव्हील रिट पिटिशअन नं.९६४३/२०१४ या न्यायालयीन प्रकरणामधील अंतिम निर्णयांच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

९) परिच्छेद-१ मध्ये नमूद केलेल्या उमेदवारानी त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून **एक महिन्याच्या आत** तात्काळ रुजु व्हावे. सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही अथवा प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात

त्यांनी वरील मुदतीत काहीही कळविले नाही तर कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदरचे आदेश रद्द करण्यात येतील.

१०) महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम , १९८१ मधील नियम ११ (१) अन्वये उपरोक्त उमेदवाराने नियुक्तीच्या तारखेपासून त्याची सहा महिन्याची सेवा पूर्ण होण्यापुर्वी आरोग्याबद्दलचे वैद्यकीय प्रमाणपत्र दाखल करणे बंधनकारक राहील.

११) शासन परिपत्रक,वित्त विभाग,क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.१८/८/२००९ मधील तरतुदीनुसार दि.१ नोव्हेंबर,२००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तिवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-याने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तिवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि.१ नोव्हेबर,२००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि.१ नोव्हेबर,२००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक,वित्त विभाग,क्रमांक:अंनियो-१००६/८७/सेवा-४,दि.१२ जानेवारी,२००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबधीत शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन), नियम,१९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील.दि.१८/८/२००९ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल,अशा शासकीय कर्मचा-यास नवीन परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना लागू ठरेल.

१२) उपरोक्त उमेदवाराचे प्रचलित नियमानुसार सेवानिवृत्तीचे वय ५८ राहील.

१३) उपरोक्त उमेदवारास नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१४) उपरोक्त उमेदवाराने नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसूचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

३. हे आदेश प्राप्त होताच संबधीत उमेदवारानी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा

४. सदर उमेदवाराची नियुक्तीबाबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात यथावकाश प्रसिध्द करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२२२१५३६३२४१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nivruti Bhaguji Marale

Digitally signed by Nivruti Bhaguji Marale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Nivruti Bhaguji Marale
Date: 2015.01.05 13:39:28 +05'30'

**( नि.भा.मराळे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे कार्यालय मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),१ मुंबई/नागपूर
४. सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई(पत्राव्दारे)
५. कुलसचिव, महाराष्ट्रातील सर्व अकृषि विद्यापीठे
६. प्राचार्य, सर्व शासकीय महाविद्यालये/संस्था
७. संचालक, सर्व शासकीय विज्ञान संस्था/भारतीय प्रशासन पुर्व प्रशिक्षण केंद्र, महाराष्ट्र राज्य
८. सर्व मंत्रालयीन विभाग
९. सर्व विभागीय सहसंचालक (उच्च शिक्षण)
१०.जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे
११.सर्व अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय , मुंबई
१२.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय , मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१३.प्रभारी संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४.श्री. माने धनराज रघुराम, कुलसचिव, बंगला, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद